वस्तू व सेवाकर विभागातील (पूर्वीचा विक्रीकर विभाग) आस्थापनांवरील मुख्य संवर्गातील १७०४ तसेच इतर संवर्गातील ५८५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. विकवि-१०१८/प्र.क्र.१४९/वि.प्र.४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०५ ऑक्टोबर २०१८.

**वाचा :-** (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक १००१/प्र.क्र.२९(भाग७)/ २००४/विसु-१, दि. १.०९.२००४.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४, दि.१८.११.२०११.
(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकआ-१२१२/प्र.क्र.१७४/वि.प्र.४,दि.३.०४.२०१४.
(४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकआ १०१४/प्र.क्र.१६७/वि.प्र.४,दि.९.०५.२०१४.
(५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२१६/प्र.क्र.५३/वि.प्र.४, दि.१३.१०.२०१६, दि.२८.०२.२०१७, दि.१७.१०.२०१७
(६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि. १०.०२.२०१७.
(७) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२१८/प्र.क्र.६/वि.प्र-४, दि.२९.०१.२०१८, दि.२०.०३.२०१८
(८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७, दि. ०३.१०.२०१७, दि. ८.०१.२०१८ व दि. ५.०३.२०१८, दि. ७.०९.२०१८
(९) राज्यकर आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. विविआ/आस्था-३/पुनर्रचना कक्ष/२०१६/प्र.क्र. ८९ दि. २८.०८.२०१८

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विकवि-१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४,दि. १८.११.२०११ अन्वये विक्रीकर विभागाच्या पुनर्रचनेचा आढावा घेण्यात आला असून मुख्य संवर्गात ९,८४२ पदांना मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन दि. ३/०४/२०१४ च्या शासन निर्णयान्वये गट-ड व अन्य किरकोळ संवर्गातील २,२७८ पदांचा आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. वस्तू व सेवाकर विभागातील (पूर्वीचा विक्रीकर विभाग) आस्थापनांवरील मुख्य संवर्गातील एकूण १७०४ अस्थायी पदांना, तसेच इतर संवर्गातील २२७८ मंजूर पदांपैकी ५८५ अस्थायी पदांना संदर्भाधीन दि. २०.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दि. ३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. विक्रीकर विभागास सदर पदांची यापुढेही आवश्यकता असल्याने उक्त अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वर प्रस्तावनेत नमूद केलेल्या वस्तू व सेवाकर विभागातील (पूर्वीचा विक्रीकर विभाग) आस्थापनांवरील मुख्य संवर्गातील एकूण १७०४ अस्थायी पदांना, तसेच इतर संवर्गातील ५८५ अस्थायी पदांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ७.०९.२०१८ मधील अटींच्या अधीन दि. २८.०२.२०१९ पर्यंतच्या मुदतवाढीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. त्यांनतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही. तरी, पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करुन त्वरीत कार्यवाही करण्यात यावी.

२. यासंदर्भात होणारा खर्च खाली नमूद केलेल्या पैकी संबंधित लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

१. "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर, (००) ००१-संचालन व प्रशासन, (००) (०१) राज्यकर आयुक्त (२०४० ००४२), ०१ वेतन"
२. "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर, १०१ वसुली खर्च, (०१) वसुली खर्च, (०१) (०१) राज्यकर विभाग, (२०४० ००५१) ०१ वेतन"
३. "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०२०, उत्पन्न व खर्च यावरील करांची वसुली (००) ००१-संचालन व प्रशासन, व्यवसाय, व्यापार आजिविका व नोकऱ्या यांवरील कर (००) (०१) राज्यकर आयुक्त (२०२० ००२३) ०१ वेतन"

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र८/१६/ आ.पु.क., दि. ७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००५१७२२३८८४०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Latika V. Patil
Date: 2018.10.05 17:30:45 +05'30'

**( लतिका वि.पाटील )**
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१) राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर,

४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर,
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, नागपूर,
६) विशेष राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव (वि.सु.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१३) कार्यासन अधिकारी, प्रशासन-४/वि.प्र.१,२,३,
१४) निवड नस्ती (वि.प्र.४).